अवर सचिव पदावरील पदोन्नती
दिनांक सुधारीत करण्याबाबत-
निवडसूची सन २०१०-२०११

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक-असप-१२१७/प्र.क्र.०१/का.१४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २ मार्च, २०१७

**संदर्भ** - शासन आदेश क्र.असप १२१२/ प्र.क्र.५०/ का.१४, दि.१५.०९.२०१२

## शासन आदेश

अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीसाठीच्या सन २०१०-२०११ च्या निवडसूचीवर पात्र ठरलेल्या अवर सचिवांची पदोन्नती संदर्भाधीन आदेशान्वये नियमित करून त्यांना ज्येष्ठतेचे दिनांक देण्यात आलेले होते.

संदर्भाधीन आदेश या आदेशान्वये अधिक्रमित करून सन २०१०-२०११ या कालावधीत सुधारीत नियमित निवडसूचीमध्ये पात्र ठरलेल्या अधिकाऱ्यांना अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचे दिनांक देण्यात येत आहेत. सदर नियमित निवडसूची खालील कारणांमुळे सुधारीत करण्यात येत आहे. -

अ) सदर निवडसूच्या अंतिम करताना सिटी टॉवर्स को.ऑप. हौ. सोसायटी, नेरुळ, नवी मुंबई या प्रकरणी शासकीय अनुदानाच्या अपहारासंदर्भात फौजदारी खटला दाखल केलेला असल्यामुळे त्या प्रकरणातील कक्ष अधिकाऱ्यांची कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नती नियमित केली नव्हती. पर्यायाने त्यांचा अवर सचिव पदावरील पदोन्नतीसाठी विचार केला नव्हता. सदर अधिकाऱ्यांना आदिवासी विकास विभागाने फौजदारी खटल्यातील निर्णयाच्या अधीन विभागीय चौकशीतून दोषमुक्त केल्यानंतर, सा.प्र.वि. कार्या.१४-ब च्या दि.११.०३.२०११ च्या आदेशान्वये सिटी टॉवर्स प्रकरणातील अधिकाऱ्यांना कक्ष अधिकारी पदावरील नियमित पदोन्नतीचे दिनांक देण्यात आले.

आ) सदर अधिकाऱ्यांना त्यांच्याविरूद्ध सुरू असलेल्या फौजदारी खटल्यातून दि.२८.०५.२०१३ रोजीच्या आदेशान्वये मा.प्रथम वर्ग न्याय दंडाधिकारी, ठाणे यांनी दोषमुक्त केले आहे. सदर निर्णया विरूद्ध शासनाच्या वतीने मा.सत्र न्यायालय, ठाणे येथे सरकारी अभियोक्ता, ठाणे यांच्यामार्फत दि.२२.०८.२०१३ रोजी क्रिमिनल अपील क्र.३३७/२०१३ दाखल करण्यात आले. मात्र मा.प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी यांच्या दि. २८.०५.२०१३ रोजीच्या आदेशास स्थगिती (stay) मिळालेली नव्हती. त्यानुसार संबंधित अधिकाऱ्यांना अपिल क्र.३३७/२०१३ मधील अंतिम आदेशाच्या अधीन राहून सामान्य प्रशासन विभाग कार्या.१४ यांच्या शासन आदेश दि.२७.१.२०१४ अन्वये अवर सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात आली. सदर अधिकाऱ्यांविरूद्ध शासनाच्या वतीने सत्र न्यायालय, ठाणे येथे दाखल केलेले अपिल क्र.३३७/२०१३ हे दि.७.३.२०१६ च्या निर्णयान्वये खारीज करण्यात आले आहे. त्यामुळे सीटी टॉवर प्रकरणातील अधिकारी दोषमुक्त झाले आहेत.

इ) सिटी टॉवर्स प्रकरणातील काही अधिकाऱ्यांनी शासनाविरूद्ध मा.मप्रन्या, मुंबई येथे मूळ अर्ज क्र.२९६/१५ दाखल करून मानीव दिनांक व ज्येष्ठता अनुषंगिक लाभाची मागणी केली होती त्यावर न्यायाधिकरणाने दि.२८.३.२०१६ रोजी अंतिम निर्णय दिला असून प्रस्तुत प्रकरणातील याचिका कर्त्यांच्या उपसचिव/ अवर सचिव पदावरील पदोन्नतीचे नियमित दिनांक/ मानीव दिनांक देण्याबाबतची कार्यवाही ४ आठवड्यात पूर्ण करावी असे निर्देशित केले आहेत.

ई) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक दि.१.१०.२०१२ नुसार उपसचिव पदावरील पदोन्नतीचे नियमित दिनांक दिल्यामुळे दि.१.९.२००२ रोजीच्या कार्यरत अवर सचिवांच्या पदसंख्येत बदल झाला आहे.

२. खाली नमूद केलेल्या कक्ष अधिकाऱ्यांना अवर सचिव पदावर यापूर्वीच तदर्थ / तात्पुरती पदोन्नती देण्यात आली आहे. आता, सदर अधिकारी अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीसाठीच्या सन २०१०-११ च्या निवडसूचीवर पात्र ठरले असल्याने सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती नियमित करण्यात येत असून त्यांना खालील विवरणपत्रातील स्तंभ ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र | श्री/ श्रीमती | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | विभागाचे नाव | अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | वि.त्रि.प्रभू | खुला | साप्रवि | ०१-०९-२०१० |
| २ | श्री | सु.न.जोशी | खुला | मववvि | ०१-०९-२०१० |
| ३ | श्री | वि.पु.काळे | विजा(अ) | नियोजन | ०१-०९-२०१० |
| ४ | श्रीमती | शु.सु.आगाशे | खुला | साप्रवि | ०२-०९-२०१० |
| ५ | श्री | भा.बा.पाटील | खुला | अनापुवग्रासंवि | ०२-०९-२०१० |
| ६ | श्रीमती | गी.मो.चांदे | खुला | पापुवस्वvि | ०२-०९-२०१० |
| ७ | श्री | सं.गि.पाटील | खुला | कौविवउवि | ०२-०९-२०१० |
| ८ | श्रीमती | शो.शि.मत्रे | खुला | वित्त विभाग | ०२-०९-२०१० |
| ९ | श्री | रा.शि.आरवारी | खुला | साप्रवि | ०२-०९-२०१० |
| १० | श्री | व्यं.हं.कुलकर्णी | खुला | उऊवकावि | ०१-१०-२०१० |
| ११ | श्री | स.ज.मोघे | खुला | नियोजन | ०१-११-२०१० |
| १२ | श्री | सु.प्र.चानकर | खुला | पापुवस्ववि | ०१-१२-२०१० |
| १३ | श्री | कि.शा.परब | खुला | साप्रवि | ०१-०१-२०११ |
| १४ | श्री | प्र.का.जोशी | खुला | मवबाविवि | १९-०५-२०११ |
| १५ | श्री | मं.रं.कर्णीक | खुला | नियोजन | १९-०५-२०११ |
| १६ | श्रीमती | मि.दि.पेडणेकर | खुला | गृहनिर्माण | १९-०५-२०११ |
| १७ | श्रीमती | स्वा.म.नानल | खुला | शाशिवक्रीवि | १९-०५-२०११ |

| अ. क्र | श्री/ श्रीमती | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | विभागाचे नाव | अवर सचिव पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | ३ | ४ | ५ |
| १८ | श्री | अ.वि.कदम | खुला | साआवि | १९-०५-२०११ |
| १९ | श्री | दि.मा.सोनावणे | इमाव | पर्यावरण | १९-०५-२०११ |
| २० | श्री | रा.म.घाडगे | खुला | पापुवस्ववि | १९-०५-२०११ |
| २१ | श्री | म.द.जाधव | अज | पापुवस्ववि | १९-०५-२०११ |
| २२ | श्री | ब.शे.मांडवे | अज | कौविवउवि | १९-०५-२०११ |
| २३ | श्री | अ.ना.वळवी | अज | साप्रवि | ०१-०६-२०११ |
| २४ | श्री | प्र.ब.सुरवसे | अज | साबांवि | ०१-०६-२०११ |
| २५ | श्री | कि.व.वाहूल | अजा | नियोजन | ०१-०६-२०११ |
| २६ | श्री | यु.ब.अजेटराव | अजा | गृह विभाग | ०१-०६-२०११ |
| २७ | श्री | म.सो.खंडारे | अजा | साप्रवि | ०१-०६-२०११ |
| २८ | श्री | सं.रा.मोरे | अजा | साआवि | २९-०६-२०११ |
| २९ | श्री | अ.ई.भरणे | अजा | मवववि | २९-०६-२०११ |
| ३० | श्री | ना.शि.भोगे | अजा | साप्रवि | २९-०६-२०११ |
| ३१ | श्री | प्र.रा.कदम | अजा | कृषी व पदुम | २९-०६-२०११ |
| ३२ | श्रीमती | सु.सु.कदम | अजा | सपववि | २९-०६-२०११ |
| ३३ | श्री | सु.ज्ञा.बोबडे | अजा | नगर विकास | २९-०६-२०११ |
| ३४ | श्री | अ.जा.बनसोडे | अजा | जलसंपदा | १९-०७-२०११ |
| ३५ | श्रीमती | ल.को.गायकवाड | अजा | अल्पसंख्याक विकास | ०२-०८-२०११ |
| ३६ | श्री | प्र.पां.घोडेराव | अजा | नियोजन | १७-०८-२०११ |
| ३७ | श्री | ब.म.मोरे | अजा | साप्रवि | १७-०८-२०११ |

३. सदर अधिकाऱ्यांना अवर सचिव पदावरील देण्यात आलेले नियमित पदोन्नतीचे दिनांक हे त्यांच्या कक्ष अधिकारी पदावरील अंतिम ज्येष्ठता सूचीत निश्चित होणाऱ्या ज्येष्ठता क्रमाच्या अधीन तसेच मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मधील अंतीम निर्णयाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३, मधील निर्णयाच्या अधीन त्याचप्रमाणे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहतील.

४. ज्या अधिकाऱ्यांविरूद्ध विभागीय चौकशी प्रलंबित आहे अशा कक्ष अधिकाऱ्यांची / तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेल्या अवर सचिवांची नांवे या आदेशात अंतर्भूत करण्यात आलेली नाहीत.

५. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०३०२१५२४१५१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.03.02 15:30:01 +05'30'

**(इ.मु.काझी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (संबंधित मंत्रालयीन विभागांमार्फत)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,
२. सह/उप सचिव (आस्थापना), सर्व मंत्रालयीन विभाग,
त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहू आदेशाची प्रत शासनाच्या संकेतस्थळावरून उपलब्ध करून घ्यावी व आपल्या विभागातील सर्व संबंधितांना (प्रतिनियुक्तीवरील अधिकाऱ्यांसह) सदरहू आदेशाची प्रत शासनाच्या संकेतस्थळावरून उपलब्ध करून घेण्याबाबत कळविण्यात यावे.
३. कार्यासन अधिकारी, कार्यासन १२/१४-ब , सामान्य प्रशासन विभाग,
४. निवडनस्ती/कार्यासन-१४.